अनूसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांकरिता ४ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : मावज २०२०/ प्र.क्र.३१/३४-अ
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - २५ ऑगस्ट, २०२०

संदर्भ :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन,क्रमांक- बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२००९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन,क्रमांक- बीसीसी-२०१८/प्र.क्र.१८७/१६-ब, दि.३०.६.२०२०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन, क्रमांक- बीसीसी-२०१९/प्र.क्र.२१०/३४-अ, दि.४.२.२०२०

प्रस्तावना :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसुचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात प्रमाणपत्र सादर करुन न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी /कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निमार्ण करणे, तसेच उक्त अनुसूचित जमातीच्या पदावर नियुक्त झालेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांची रिक्त होणारी पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्र पाठविणे याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिनस्त असणाऱ्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील अधिकारी/कर्मचारी याची १० पदे निर्माण करण्यास संदर्भाधिन दि.४.२.२०२० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता उपसंचालक-१, पर्यवेक्षक-१, प्रतिवेदक-१ व दूरमुद्रणचालक-१ अशी एकूण ४ अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले, जात पडताळणी केलेले, जात पडताळणी समितीच्या निर्णयाविरोधात मा. न्यायालयात याचिका दाखल केलेले मात्र मा. न्यायालयाने स्थगिती न दिलेले व जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरविल्याने सेवा समाप्त केलेल्या सोबतच्या विवरणपत्रातील अधिकारी/कर्मचारी यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर या शासननिर्णयान्वये ४ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहे.

१. उपरोक्त नमुद केल्यानुसार एकूण ४ अधिसंख्य पदे संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

२. ज्या अधिकारी/कर्मचारी यांचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात मा. न्यायालयामध्ये याचिका प्रलंबित असतील अशा प्रकरणी सामान्य प्रशासन विभाग / का १६-ब यांच्या शासन निर्णय दिनांक २१.१२.२०१९ ३(क) येथील सूचनेनुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने मा. सर्वोच्च न्यायालयाचे दिनांक ६.७.२०१७ चे आदेश संबंधित न्यायालयाच्या निर्देशनास आणून, अशी प्रकरणे तात्काळ निकाली काढण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही माहिती व जनसंपर्क संचालनालयाने करावी.

३. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे अधिकारी / कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून सर्व संबंधित नियुक्ती अधिकाऱ्यांनी करावयाच्या नियुक्त्या तातपुरत्या स्वरुपात ११ महिन्याकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत या पैकी जे अधी घडेल तो पर्यंतच्या कालावधीसाठी कराव्यात. सदर अधिकारी/कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्थित्वात राहिल.

४. शासन निर्णयापूर्वी सेवा समाप्त करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचारी सेवा समाप्तीपूर्वी ज्या पदावर कार्यरत होते त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत आहे. सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याकरीता किंवा ते सेवेत सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत या पैकी जे अधी घडेल तो पर्यंतच्या कालावधीसाठी कराव्यात. सदर अधिकारी/कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्थित्वात राहिल.

५. या आदेशान्वये निर्माण केलेल्या अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्याबाबतचे आदेश संबंधित नियुक्ती सामान्य प्रशासन विभाग / कार्या १६ब, शासन निर्णय दिनांक २१.१२.२०१९ नुसार तात्काळ निर्गमित करावेत. व त्याची प्रत या विभागास तात्काळ उपलब्ध करून द्यावी.

६. अधिसंख्य पदावर येणारा खर्च हा संबंधित अधिकारी / कर्मचारी सध्या ज्या विभागात कार्यारत आहेत, त्या विभागाच्या वेतनासंबंधीच्या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचा क्र. बीसीसी २०१८ /प्र.क्र. ३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९ शासन निर्णया मधील तरतूदीनुसार व शासन निर्णय सामान्य प्रशासन क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/ दिनांक ३० जून २०२० अन्वये प्रशासकीय विभागाला देण्यात आलेल्या प्राधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८२५१६१३२१५५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2020.08.25 16:29:11 +05'30'

( रा.ना. मुसळे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव (मावज), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर
४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर
५. संचालक (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८. सर्व विभागीय माहिती कार्यालय / जिल्हा माहिती कार्यालय, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१०.सामान्य प्रशासन विभाग (का-१६ब), मंत्रालय, मुंबई
११.वित्त विभाग, (कार्यासन आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई
१२.संबंधित अधिकरी / कर्मचारी (मावज मार्फत)
१३.निवड नस्ती (कार्या-३४/अ)

## विवरणपत्र

### जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या तसेच जात वैधता प्रमाणपत्रांबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेले अधिकारी/कर्मचारी.

| अ. क्र. | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृती दिनांक | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. अनिलकुमार लालयाजीराव आलुरकर | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई | १५.५.१९९५ | ३१.१.२०२८ | रु. १,४७,९७०/- |
| २ | श्रीमती प्रज्ञा भु. गायकवाड | पर्यवेक्षक, गट-क, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई | १५.४.१९९४ | ३०.६.२०३० | रु. ५८,९५४/- |
| ३ | श्री. अशोक किसनराव नागोसे | प्रतिवेदक, गट-क, अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने कार्यालय, मुंबई | ४.४.१९९५ | ३०.३.२०२४ | रु. ५५,९७२/- |
| ४ | श्री. अशोक गणपती सोनकुसरे | दूरमुद्रणचालक, गट-क, संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नागपूर-अमरावती विभाग, नागपूर | २.४.१९९४ | ३१.१२.२०२९ | रु. ५३,७०७/- |